**आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्या आस्थपनेवरील उपायुक्त समाज कल्याण, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन २०२० मधील बदल्यांबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ -२०२०/प्र.क्र. १२०/ आस्था-२**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० ऑगस्ट, २०२०.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम - ४ मधील तरतुदीनुसार समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या उपायुक्त समाज कल्याण व तत्सम गट अ (सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी १५६००-३४८०० ग्रेड पे ६६००) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदल्या करण्यात येत असुन, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.प्रशांत चव्हाण | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, कोल्हापूर | उपायुक्त (प्रशासन), समाज कल्याण आयुक्तालय, पुणे (श्री.रविंद्र कदम-पाटील यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| २ | श्री.सुरेंद्र पवार | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, वर्धा | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, नागपूर (रिक्त पदावर) |
| ३ | श्री.रविंद्र कदम पाटील | उप आयुक्त (प्रशासन), समाज कल्याण आयुक्तालय, पुणे | उपायुक्त (नाहसं), समाज कल्याण आयुक्तालय, पुणे (श्री.शरद चव्हाण यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ४ | श्री.एस. आर. दाणे | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, अहमदनगर | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, औरंगाबाद (रिक्त पदावर) |
| ५ | श्री. बी. एस. केंन्द्रे | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, हिंगोली | उपायुक्त (शिक्षण), समाज कल्याण आयुक्तालय, पुणे (रिक्त पदावर) |
| ६ | श्री.एस. एम. चव्हाण | उपायुक्त (नाहस), समाज कल्याण आयुक्तालय, पुणे | प्रशासकीय अधिकारी, समता प्रतिष्ठान, नागपूर (रिक्त पदावर) |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे -

१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर आयुक्त समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास बदली झालेल्या पदावर रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

२) बदली झालेला अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यावर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल.

३) बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१६४२४७४९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2020.08.11 17:54:22 +05'30'

**(अ.कों. आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
४) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण , संस्था पुणे
५) अध्यक्ष/सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती (सर्व)
६) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण (सर्व)
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
९) मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
१०) मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
११) मा.सचिव (सा. न्या. व वि. स. विभाग/ विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती आस्था-२.